**श्रीमती लता महेंद्र इंगळे, नगर रचनाकार तथा विशेष भूमि संपादन अधिकारी, विशेष घटक, औरंगाबाद यांची नगर रचनाकार, मूल्यांकन तज्ञ, जळगांव पदावर बदलीने पदस्थापना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.बदली-५८१५/१०५९/प्र.क्र.१७६/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०३ ऑक्टोबर, २०१५.

<u>वाचा</u> :- १. श्रीमती लता महेंद्र इंगळे, नगर रचनाकार तथा विशेष भूमि संपादन अधिकारी, विशेष घटक, औरंगाबाद यांचा विनंती अर्ज, दि.०८.०६.२०१५.

२. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा अहवाल, दि.११.०८.२०१५.

**<u>प्रस्तावना :-</u>**

श्रीमती लता महेंद्र इंगळे, नगर रचनाकार तथा विशेष भूमि संपादन अधिकारी, विशेष घटक, औरंगाबाद यांचे पती डॉ. श्री. महेंद्र इंगळे, प्रशिक्षण व आस्थापना अधिकारी यांची उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.बदली-४३१५/प्र.क्र.१२८/१५/तांशि-७, दि.०८ मे, २०१५ अन्वये शासकीय तंत्रनिकेतन, औरंगाबाद येथून शासकीय तंत्रनिकेतन, जळगांव येथे बदली करण्यात आली आहे. त्यास अनुलक्षून श्रीमती ल. म. इंगळे, नगर रचनाकार तथा विशेष भूमि संपादन अधिकारी, विशेष घटक, औरंगाबाद यांनी त्यांना उच्च रक्त दाबाचा त्रास असल्याने प्रकृतीच्यादृष्टीकोनातून एकटीला औरंगाबाद येथे रहाणे शक्य नाही. त्यामुळे वैयक्तिक आरोग्याचा व कौटुंबिक अडचणीचा सहानुभूतिपूर्वक विचार करुन शासनाच्या पती-पत्नी एकत्रीकरणासंबंधीच्या धोरणानुसार त्यांची जळगांव येथे मूल्यांकन तज्ञ, जळगांव रिक्त पदावर बदली करण्याबाबत **संदर्भ-१** येथील दि.०८.०६.२०१५ च्या अर्जान्वये विनंती केलेली आहे.

**०२.** संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या **संदर्भ-२** येथील दि.११.०८.२०१५ रोजीच्या अहवालानुसार नगर रचनाकार, मूल्यांकन तज्ञ, जळगांव पद दि.११.१०.२०13 पासून रिक्त असल्याने श्रीमती ल. म. इंगळे, नगर रचनाकार यांच्या विनंतीनुसार त्यांची उक्त पदावर बदली करण्याबाबत शासनस्तरावर निर्णय घेणे संयुक्तिक राहील, असा अहवाल सादर केलेला आहे.

**०३.** सबब, श्रीमती ल. म. इंगळे, नगर रचनाकार तथा विशेष भूमि संपादन अधिकारी, विशेष घटक, औरंगाबाद यांची नगर रचनाकार, मूल्यांकन तज्ञ, जळगांव पदावर बदलीने पदस्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व कलम ४ (५) मधील तरतुदींनुसार श्रीमती लता महेंद्र इंगळे, नगर रचनाकार तथा विशेष भूमि संपादन अधिकारी, विशेष घटक, औरंगाबाद यांची नगर रचनाकार, मूल्यांकन तज्ञ, जळगांव पदावर बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

**०२.** संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी श्रीमती लता महेंद्र इंगळे, नगर रचनाकार तथा विशेष भूमि संपादन अधिकारी, विशेष घटक, औरंगाबाद यांना पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्याकरिता त्यांच्या पदस्थापनेबाबतचे आवश्यक ते कार्यकारी आदेश तात्काळ निर्गमित करण्याची कार्यवाही करावी. संचालक, नगर रचना, पुणे यांचे पदस्थापनेबाबतचे कार्यकारी आदेश प्राप्त होताच श्रीमती ल. म. इंगळे, नगर रचनराकार यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे.

**०३.** श्रीमती ल. म. इंगळे, नगर रचनाकार यांची विनंती बदली असल्याने त्यांना पदग्रहण अवधी व संयुक्त बदली अनुदान अनुज्ञेय नाही.

**०४.** श्रीमती ल. म. इंगळे, नगर रचनराकार ह्या पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाल्या, याबाबतची माहिती शासनास त्वरित अवगत करण्यात यावी.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक २०१५१००३१७३९१६७२२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Siddharam K Salimath

Digitally signed by Siddharam K Salimath
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Siddharam K Salimath
Date: 2015.10.03 17:44:03 +05'30'

**( एस. के. सालीमठ )**
**महाराष्ट्र शासनाचे उप सचिव.**

**प्रत :-**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
२. मा. मुख्य मंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. **(३-प्रती)**
४. विभागीय सह संचालक, नगर रचना, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
५. विभागीय सह संचालक, नगर रचना, नाशिक विभाग, नाशिक.

६. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, जळगांव.
८. नगर रचनाकार तथा विशेष भूमि संपादन अधिकारी, विशेष घटक, औरंगाबाद.
९. नगर रचनाकार, मूल्यांकन तज्ञ, जळगांव.
१०.प्रधान सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.श्रीमती लता महेंद्र इंगळे, नगर रचनाकार तथा विशेष भूमि संपादन अधिकारी, विशेष घटक, औरंगाबाद.

**(संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत)**

१२.निवडनस्ती / नवि-२७.

*****